**<u>शिवभोजन योजनेबाबत मार्गदर्शक सूचना..</u>**

# महाराष्ट्र शासन

**अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक -शाभोथा-२०२२/प्र.क्र.३३/नापु-१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ३० मार्च, २०२२

<u>वाचा:-</u> १) शासन निर्णय क्रमांक -शाभोथा-२०१९/प्र.क्र.५१/नापु-१७, दि. ०१ जानेवारी, २०२०.
२) शासन परिपत्रक क्रमांक -शाभोथा-२०१९/प्र.क्र.५१/नापु-१७, दि. २८ मार्च, २०२०.
३) शासन निर्णय क्रमांक -शाभोथा-२०१९/प्र.क्र.५१/नापु-१७, दि. २६नोव्हेंबर, २०२०.
४) शासन निर्णय क्रमांक- शिभोथा-२०२०/प्र.क्र.१३२/नापु-१७, दि. १५एप्रिल, २०२१
५) शासन निर्णय क्रमांक -शाभोथा-२०१९/प्र.क्र.५१/नापु-१७, दि. १९ एप्रिल, २०२१.

**<u>प्रस्तावना:-</u>**

शासन निर्णय दि.१९.०४.२०२१ च्या तरतुदीनुसार शासनास प्राप्त झालेल्या शिवभोजन केंद्राच्या प्रस्तावांना शासन स्तरावरून मान्यता देण्यात येते. शासनाने मंजूरी दिलेल्या अशा प्रस्तावांबाबत शिवभोजन केंद्रासाठी आवश्यक असलेल्या निकषांची पूर्तता होते किंवा कसे याची खात्री करूनच नवीन शिवभोजन केंद्र सुरू करण्याची परवानगी क्षेत्रीय कार्यालयाने देण्याबाबतच्या सूचना उपरोक्त शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आल्या आहेत. अशा प्रकारे मंजूरी प्राप्त झालेल्या शिवभोजन केंद्राचा पत्त्यामध्ये बदल करण्याबाबतचे प्रस्ताव शासनास प्राप्त होत असतात. त्याबाबतची वस्तुस्थिती तपासून त्यावर निर्णय होईपर्यंत संबंधित शिवभोजन केंद्र कार्यान्वित होत नसल्याचे शासनाच्या निर्दशास आले आहे. तसेच शिवभोजन केंद्रामध्ये अनियमितता आढळून येत असल्याबाबत वेळोवेळी शासनास तक्रारी प्राप्त होत असतात. त्यासंदर्भात जिल्हा पातळीवरच निर्णय घेणे आवश्यक आहे, जेणेकरुन अशा अनियमिततांबाबत वेळीच कारवाई करता येईल. तसेच शासनाने मंजूर केलेल्या शिवभोजन केंद्रांपैकी अद्याप अकार्यान्वित असलेल्या शिवभोजन केंद्रांबाबत निर्णय घेणे आवश्यक आहे. या सर्व बाबी विचारात घेता खालीलप्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन परिपत्रक :-**

१. शासनाने मंजूरी दिलेल्या शिवभोजन केंद्राच्या पत्त्यामध्ये सुयोग्य कारणांस्तव बदल करताना शासनाने मंजूर केलेल्या कार्यक्षेत्रात बदल न करता ( उदा. ग्रामीण ते शहरी असा बदल न करता ) अशा प्रस्तावांवर संबंधित जिल्हाधिकारी/ नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई यांचे मान्यतेने कार्यवाही करण्यात यावी.

२. शिवभोजन थाळीची व शिवभोजन केंद्रांची कार्यक्षमता व गुणवत्ता तपासणीसाठी जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी/ उपनियंत्रक, शिधावाटप यांचे अध्यक्षतेखाली तपासणी पथक तयार करून शिवभोजन केंद्राच्या नियमित तपासणी बरोबरच अचानक तपासण्याही करण्यात याव्यात.

३. शासनाने मंजूर केलेल्या शिवभोजन केंद्रांपैकी जी शिवभोजन केंद्र अद्याप कार्यान्वित झाली नाहीत. अशा केंद्रांना दि. ३०.०४.२०२२ पर्यंत कार्यान्वित करण्याची नोटीस देण्यात यावी. दि.३०.०४.२०२२ नंतर अशी अकार्यान्वित शिवभोजन केंद्र रद्द करण्यात येऊन त्याबाबतची माहिती शासनास सादर करावी.

४. अनियमितता आढळून येणा-या शिवभोजन केंद्रावर अनियमिततेचे स्वरुप विचारात घेऊन जिल्हाधिकारी/ नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा यांचे स्तरावर खालीलप्रमाणे कारवाई करण्यात यावी:-

अ) **सौम्य स्वरुपाची अनियमितता** उदा. शिवभोजन केंद्र वेळेत सुरु न करणे, शिवभोजन केंद्राचा फलक न लावणे, अभिप्राय नोंदवही न ठेवणे, शिवभोजन केंद्रामध्ये पुरेशी स्वच्छता नसणे अशा स्वरुपाच्या अनियमितता आढळून आल्यास संबंधित केंद्रास कारणे दाखवा नोटिस देण्यात यावी. अशा बाबी दुबार आढळल्यास गंभीर स्वरुपाची अनियमितता गृहित धरुन दंड आकारण्यात यावा. त्यानंतरही सुधारणा न झाल्यास सदर शिवभोजन केंद्र बंद करण्यात यावे.

आ) **गंभीर स्वरूपाची अनियमितता** उदा. पूर्व कल्पना न देता शिवभोजन केंद्र बंद ठेवणे, शिवभोजन निकषाप्रमाणे भोजन न देणे, CCTV कार्यान्वित नसणे, CCTV चा डेटा उपलब्ध करून न देणेअशा स्वरुपाच्या अनियमितता आढळल्यास किमान एक दिवसाची प्रतिदिन थाळीसंख्येची पूर्ण रक्कम किंवा रु.५०००/- यापैकी जी रक्कम जास्त असेल ती दंड म्हणून आकारण्यात यावी. यानंतरही पुढील तपासणीमध्ये अशा प्रकारची गंभीर स्वरुपाची अनियमितता आढळल्यास सदर शिवभोजन केंद्र बंद करण्यात यावे.

इ) **अतिगंभीर स्वरुपाची अनियमितता** उदा. शिळे/निकृष्ट दर्जाचे भोजन देणे, दुबार फोटो अपलोड करणे, शिवभोजन केंद्र अन्य व्यक्तीमार्फत चालविणे अशा स्वरुपाच्या अनियमितता आढळून आल्यास शिवभोजन केंद्र तात्काळ निलंबित करून सदर केंद्राची मंजूरी रद्द करण्याची कारवाई करण्यात यावी.

ई) वर नमूद केलेल्या अनियमिततेव्यतिरिक्त अन्य काही अनियमितता आढळून आल्यास अनियमिततेचे स्वरुप व त्याप्रकरणी करावयाची कारवाई याबाबत

संबंधित जिल्हाधिकारी/ नियंत्रक, शिधावाटप यांच्या स्तरावर निर्णय घेण्यात यावा.

वरीलपैकी अ ते ई मधील कारवाई करावयाची असल्यास नैसर्गिक न्याय तत्वानुसार संबंधित केंद्रचालकाला त्यांची बाजू मांडण्याची संधी देण्यात यावी. तसेच, शिवभोजन केंद्र बंद केल्यास त्याबाबत शासनास तात्काळ कळवावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक क्र. २०२२०३३०१२०१०३०२०६ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

CHARUSHILA
CHANDRAKANT
TAMBEKAR

Digitally signed by CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=332dfd6e6db0a06570cca25f9c39add2bebc7d207b3405d11e474330d0a9e014, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2B0496C0C213A3F50C6522CC39AE5DE95E1150AC3287E89C21B1422E313820A2, cn=CHARUSHILA CHANDRAKANT TAMBEKAR
Date: 2022.03.30 17:06:44 +05'30'

**(चारुशीला तांबेकर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री (अनापुवग्रासं) यांचे खाजगी सचिव
२)मा. राज्यमंत्री (अनापुवग्रासं) यांचे खाजगी सचिव
३)सचिव (अनापुवग्रासं) यांचे स्वीय सहाय्यक
४)सर्वजिल्हाधिकारी
५)नियंत्रक, शिधावाटपवसंचालक, नागरी पुरवठा, मुंबई
६)वित्तीय सल्लागार व उपसचिव, मुंबई
७)सर्वउपायुक्त पुरवठा
८)सर्व उपनियंत्रक
९)सर्व जिल्हापुरवठा अधिकारी
१०)सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
११)सर्व तहसीलदार
१२)निवडनस्ती (नापु-१७)